# ‘ध्वनिमुद्रण ः कला व परंपरा’

--------------------------------------------------------------------------------

आवाज साठवून ठेवायची म्हणजेच ध्वनिमुद्रणाची कला आता एकशे पस्तीस वर्षांची होऊ घातली आहे. १८७७ साली थॉमस अल्वा एडिसननं अमेरिकेत ‘मेरी हॅड अ लिटल लँब’ हे शिशुगीत नळकांडयावरती (सिलींडर रेकॉर्ड) मुद्रित करून हया कलेचा पाया घातला व लगेच ‘एडिसन होम फोनोग्राफ’ ची निर्मिती केली. पाठोपाठ एकवीस वर्षांनी १८९८ मध्ये त्यानंच हालती चित्रं दाखवण्यासाठी ‘किनेटोस्कोप’ नावाच्या अनोख्या यंत्राची निर्मिती केली. मेनलो पार्क येथील त्याच्या कामाच्या जागेला तो ‘शोध कारखाना’ (इन्व्हेंशन फॅक्टरी) असंच म्हणत असे. आजूबाजूचे लोक त्याला ‘मेनलो पार्कचा जादूगार’ म्हणत. वीजनिर्मिती पासून ते विजेच्या दिव्यापर्यंत अनेक शोध लावून त्यानं आपलं नाव विज्ञान-तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात अमर करून ठेवलं. ‘होम फोनोग्राफ’चा उपयोग सक्रेटरीला पत्रं वगैरे डिक्टेट करायला व ‘किनेटोस्कोप’चा उपयोग केवळ शैक्षणिक कामांसाठी होऊ शकेल इतकीच माफक अपेक्षा एडिसनला होती. त्यामुळं शोध लावल्यावरती रीतसर पेटंट वगैरे घेऊन (अगदी मुंबईत १८७८ सालीच त्यानं आपल्या एजंटामार्फत भायखळयाला ‘एडिसन होम फोनोग्राफ’चं पेटंट घेऊन ठेवल्याचा दस्तावेज उपलब्ध आहे) तो शांतपणे दुस-या कामांकडे वळला. हया दोन्ही शोधांमुळे पुढच्या शतकात देशोदेशी फार मोठे उद्योग उभे राहून लाखो लोकांना रोजगार मिळेल, मोठाली साम्राज्यं उभी राहून फार पैशांची मोठी उलाढाल होईल हयाची त्याला काहीच कल्पना आलेली नव्हती.

कासाराकडचा बांगडया भरून ठेवायचा दंडगोल आडवा करून ठेवला तर कसा दिसेल? खाचा पाडलेली सिलिंडर रेकॉर्ड अगदी तशीच दिसे. त्यामुळेच तिला आपल्याकडे 'बांगडी'ची किंवा 'चुडीवाली रिकार्ड' असं म्हणत. लेथ मशीनसारख्या दिसणा-या यंत्रावर चढवून ती हातानं फिरवावी लागे. शोध लागल्यानंतर वर्षभराच्या आतच हिंदुस्थानात एडिसनच्या कंपनीचे 'होम फोनोग्राफ'स काही राजांकडे, संस्थानिकांकडे व श्रीमंतांच्याकडे आले. त्यांनी हौसेने मोकळे सिलिंडर्स मागवून घरच्या मंडळींची ध्वनिमुद्रणं पण करून घेतली. पण हा सगळा चार घटका करमणुकीचा व हौसमौजेचा मामला होता. हयाच्याकडं एक खेळणं म्हणूनच त्या काळी तरी बघितलं गेलं होतं. हे मशीन बोलणारं म्हणून त्याला 'टॉकींग मशीन' म्हणत असत. १८७८ साली सर जगदीश चंद्र बसू (बोस) हयांनी कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमध्ये शास्त्र शाखेच्या विद्यार्थ्यांना हया यंत्राचं प्रात्यक्षिक दाखवून त्यात रविंद्रनाथांचा आवाज मुद्रित केला होता अशी नोंद आहे. ही सगळी ध्वनिमुद्रणं काळाच्या उदरात कधीच गडप झाली.

पुढे हेमेंद्र मोहन बोस () हया बंगाली तरूणानं हयाचा ध्यास घेतला व कलकत्ता शहरात हा उद्योगच सुरू केला. १९00 साली त्यांनी एडिसनची 'होम रेकॉर्डिंग मशीन्स' खरेदी केली व कलकत्ता परिसरातल्या गाजलेल्या गायक गायिकांची गाणी मुद्रित करायचा सपाटाच लावला. ध्वनिमुद्रण करण्यासाठी मोकळी नळकांडी म्हणजेच बांगडया बनवायचा कारखाना उभारला. 'टॉकींग मशीन हॉल' नावाचं दुकान थाटलं. त्यात जाऊन कुणीही आपला आवाज मुद्रित करून घेत असे. हया बांगडीच्या रेकॉर्डस 'एच. बोस रेकॉर्डस' नावानं विकल्या

जात असत.हा व्यवसाय १९१५ पर्यंत चालू होता.त्यात पुढं ग्रामोफोन, सायकली, पंखे, मोटरगाडी, अत्तरे अश्या आणखी कितीतरी वस्तूंच्या विक्रीची भर पडत गेली.

१८८८ मध्ये अमेरिकेतच एमिली बर्लिनर हया जर्मनीच्या हौशी तंत्रज्ञांनं पोकळ नळकांडयाच्या(सिलींडर)ऐवजी सपाट तबकडीवरच्या ध्वनिमुद्रणांची कल्पना प्रत्यक्षात आणली.तिची प्रयोगावस्था संपायला आणखी दहा वर्षे जावी लागली.हयाचा व्यापारी उपयोग होऊ शकतो हयाची कल्पना आल्यावर युरोपात १८९८ साली लंडन येथे ‘दि ग्रामोफोन अँड टाईपरायटर्स कंपनी लिमिटेड’ ची रीतसर स्थापना झाली.पण पुढं ग्रामोफोन व तबकडयांनीच एवढा पसारा वाढवला की टाइपरायटरची लाईन बंदच करावी लागली.हया सपाट तबकडया चावीवाल्या ग्रामोफोन मशीनवर वाजवल्या जायच्या व पितळेच्या कर्ण्यातून आवाज ऐकायला येई.ध्वनिमुद्रण करताना पण कर्णा हाच ध्वनिग्राहक म्हणून वापरत.हयात कुठंही विजेचा वापर नसे.हातानं चावी भरून स्प्रिंग गुंडाळून घ्यावी लागे.स्प्रिंग मोटर वापरून तबकडी ७८ गतीनं फिरत असे.तिच्यावरील खाचांमधून अणकुचीदार सुई अलगद फिरू लागली की तिला जोडलेला धातूचा पातळ पडदा कंप पावू लागे.ही कंपनं मग कर्ण्यातून आवाजाच्या रूपानं बाहेर पडत.अश्या ध्वनिमुद्रणांना ‘अकौस्टिक रेकॉर्डिंग’ म्हणत.

१८९९ साली भारतीय गाण्यांच्या ४३ ध्वनिमुद्रिका लंडन येथे बनवण्यात आल्या.सात इंच व्यासाच्या व एकाच बाजूला मुद्रण असलेल्या हया रेकॉर्डस जेमतेम मिनिट दीड मिनिट वाजत.त्यात

डॉ.हरनामदास यांची वाल्मिकी रामायणातली पदं, श्री.अहमद यांचं कुराणातल्या आयतांचं पठण व श्री.हजरत यांनी म्हटलेल्या कविता यांचा समावेश आहे.

एमिली बर्लिनरचा सहाय्यक एफ.डब्ल्यू.गैसबर्ग हा मुख्य ध्वनिमुद्रक म्हणून लंडनच्या हया उद्योगात काम पाहू लागला होता.जस्ताच्या गोल तबकडीवरील मेणाच्या जाड लेपनात खाचा पाडल्या जात.त्यांना मास्टर रेकॉर्डस म्हणत व पुढील प्रक्रियेकरिता जर्मनीला पाठवीत.तिथं बर्लिनरच्या धाकटया भावानं, जोसेफ बर्लिनरनं रेकॉर्डस छापायचा कारखाना उभारला होता.रेकॉर्डस छापून, लेबल लावून विक्रीयोग्य प्रती देशोदेशी रवाना होत असत.गैसबर्गनं आणखी काही मुद्रकांना ही विद्या शिकवली व पुढील दहा वर्षात शेकडो मुद्रणं देशोदेशी जाऊन केली.लेबलवरती ‘मेड इन जर्मनी’ असं छापलेलं असे व गाण्याच्या शेवटाला कलाकार आपलं नाव मोठयानं ओरडून सांगत असे.जसं की, ‘माय नेम इज गोहरजान’.त्यामुळं जर्मनीत लेबल बनवणा-या तंत्रज्ञाचं काम सोपं होत असे.स्वतंत्र कागदपत्रं व नोंद वहया असतच.पण कलाकाराचं नाव अचूक नोंदलं जावं यासाठी ही खास योजना होती.

१९०२ साली गैसबर्ग आपल्या सहका-यांच्या बरोबर बोटीने कलकत्ता येथे आला.आशिया व अतिपूर्वेकडील ध्वनिमुद्रण मोहीमेचा हा भाग होता.हया माध्यमाकडे नाटकात काम करणा-या पात्रांनी व कोठेवाल्या बायकांनी उत्पन्नाचं आणखी एक साधन म्हणून बघितलं.तर अभिजात संगीतातल्या दिग्गजांनी त्याकडं अजिबात लक्ष

दिलं नाही. १९०२ ते १९०७ हया काळात तीन मोहीमांत मिळून तीनेक हजार गाणी घेण्यात आली. त्यात कलकत्तेवाली गौहरजान, अलाहाबादची जानकीबाई, मौजुद्दिन खान व प्यारासाहेब यांच्या शेकडो ध्वनिमुद्रिकांचा समावेश आहे. बडया गवयांनी 'तीन मिनटमे क्या गाना' असं म्हणून नाकारलं. एकच सन्माननीय अपवाद. १९०४ साली मुंबईत अब्दुल करीम खान हया होतकरू गवयानं तेवीस गाणी मुद्रित केली. दक्षिण मुंबईतल्या रिदम हाऊसपासच्या आजच्या चेतना रेस्टॉरंटच्या माडीवर ही मुदणं झाली. दोन वर्षांनी हया मिनिट दोन मिनिट वाजणाऱ्या रेकॉर्डस बाजारात विक्रीसाठी आल्या. पण त्यांची कुणीही फारशी दखल घेतली नाही. खानसाहेबांच्या अधिकृत चरित्रातही त्यांचा अजिबात उल्लेख नाही. फारच तुरळक प्रती पहावयाला मिळत. मात्र त्याच्या कोऱ्या करकरीत प्रती ग्रामोफोन कंपनीच्या लंडन येथील संग्रहालयात पडून होत्या. त्यांचा शोध घेऊन ऑस्ट्रेलियाच्या मायकल किन्नर नावाच्या संग्राहक, संशोधक व 'डिस्कोग्राफर'नं त्याची टेप व सी. डी. १९९४ साली कंपनीला वितरीत करायला लावली. 'चेअरमन्स चॉईस' हया मालिकेत. जुन्या बाईजींच्या निवडक गाण्यांचं पण पुन्हा वितरण करण्यात आलं. आज ही पुन्हा वितरित झालेली गाणी पण मिळणं अवघड झालेलं आहे.

हया लाखेच्या फटू शकणाऱ्या ध्वनिमुद्रिका जर्मनीत छापवून घेऊन परत भारतात येईतो दोनेक वर्ष निघून जात. बिहार व बंगाल मध्ये लाख मोठया प्रमाणावर उपलब्ध पण होती. त्यामुळं १९०८ साली कंपनीनं कलकत्ता येथे सिअॅल्धा स्टेशनच्या बाहेर रेकॉर्डस तयार करायचा कारखाना उभारला. सुरूवातीची हयाची क्षमता दिवसाला

एक हजार ध्वनिमुद्रिका छापण्याची होती तर १५,००० रेकॉर्डस साठवून ठेवण्याची सोय होती. शिवाय ग्रामोफोन मशीन्स, सुया, पेटया वगैरे पण बनत. ग्रामोफोन मशीन भद्र लोकांच्या दिवाणखान्यात किंवा गावात चावडीवर ठेवून सामूहिक श्रवण करणं चांगलंच अंगवळणी पडू लागलं होतं.

हया पहिल्या दशकात डझनभर कंपन्या हया नवीन व्यवसायात उतरलेल्या होत्या. ब्रिटिश, जर्मन, स्वीडीश, जपानी व फ्रेंच कंपन्यांचे एजंट येऊन ध्वनिमुद्रणं करून जात. बेका, ओडियन, निकोल, सन, कमला, व्हिएलो फोन, राम-ए-फोन, पॅथे, बिनापानी, जेम्स ऑपेरा, सिंगर अश्या लेबलवरती त्या वितरीत होत. अनेक व्यापारी हया विलायती मालाची एजन्सी घेऊन व्यवसाय करीत. हयात मुंबईकर उद्योजकांचा वाटाही लक्षणीय होता. एस. रोझ आणि कंपनी दक्षिण मुंबईतल्या 'काला घोडा' च्या समोरच होती. ती कोलंबिया मशीन्स व सिलींडर्स विकत असे. १९०२ मध्ये माहीमच्या वल्लभदास रणछोडदास याने एडिसन, पॅथे व ओडियन कंपन्यांची मशीन्स व रेकॉर्डस विक्रीची एजन्सी घेतली व आपल्या साबण, सायकली व मोटार विक्रीच्या व्यवसायाचा विस्तार केला. पुढे बेका व ओडियन कंपनीच्या देशी ध्वनिमुद्रणांची मोहीम त्यांनी राबवली व १९३० पर्यंत अनेक मुद्रणं केली. आजही जे. जे. स्कूल ऑफ आर्टस समोरच्या फुले मंडई कडे (क्रॉफर्ड मार्केट) जाणा-या रस्त्यावरच्या चौकाला वल्लभदास रणछोडदास यांचं नाव देऊन त्यांच्या कर्तृत्वाला सन्मानित केल्याचं पहावयाला मिळतं.

तो काळच ध्वनिमुद्रिकांच्या वैभवाचा होता. सिनेमा अजून मुका होता. त्याला वाचा फुटून मूकपटांचे बोलपट व्हायला १९३१/१९३२ चा कालखंड यावा लागणार होता. हिंदुस्थानात रेडियो १९२५ साली सुरू झाला. मराठी, हिंदी, बंगाली, गुजराथी, उर्दू व पारसी रंगभूमीच्या ऐन वैभवाचा तो काळ होता. त्या नाटकातल्या गाण्यांच्या व संवादांच्या ध्वनिमुद्रिका सुद्धा चांगल्या खपत असत. हयाच काळात बालगंधर्व, केशवराव भोसले, मास्तर कृष्णराव, बापूराव पेंढारकर, विनायकराव पटवर्धन, माधवराव वालावलकर, कृष्णराव शेंडे, दीनानाथ मंगेशकर, गंगाधरपंत लोंढे, हिराबाई बडोदेकर हयांच्या नाटकातल्या गाण्यांच्या ध्वनिमुद्रिका अफाट गाजल्या व खपल्या.

मुंबईतल्या काळबादेवी परिसरात मेट्रोपासून ते भेंडीबाजारापर्यंत ग्रामोफोन रेकॉर्डसचे असंख्य ठोक व किरकोळ विक्रेते होते. अक्षरशः ध्वनिमुद्रिकांचे ढीगच्या ढीग विक्रीसाठी दुकानांबाहेर हारीनं मांडून ठेवलेले असत. काळबादेवी रस्त्यावर १८८८ साली स्थापन झालेली ‘दादाफोन टॉकींग मशीन कंपनी’ हे मुंबईतलं सर्वात जुनं विक्री केंद्र. त्याचा फलक दुकानाबाहेर अगदी अलिकडच्या काळापर्यंत पहायला मिळे. हयाच परिसरात ‘जेम्स ऑपेरा रेकॉर्ड’चा हॅंड प्रेस वापरून रेकॉर्डस छापायचा कारखाना होता. जर्मन तंत्रज्ञांच्या देखरेखेखाली इथं काही वर्षे मुद्रणं घेण्यात आली. इथेच १९०६ ते १९३० हया काळात टी. एस. रामचंद्र अँड ब्रदर्सचा ‘रामाफोन’ लेबलवरच्या रेकॉर्डस बनवून विकण्याचा व्यवसाय जोरात चालू होता. यांचं वैशिष्टय म्हणजे अखेरपर्यंत आपल्या रेकॉर्डस जर्मनीतून छापवून आणून इथं विकत असत. मुराद अली, मा. भागू, मि. हिम्मत,

सोराबजी धोंडी, चंदा कारवारकरीण, मुहम्मद हुसेन, क्रिष्णी झुल्पावाली इ.त्या काळात गाजलेल्या गायक गायिकांच्या व नाटकांतल्या संवाद व गाण्यांच्या अनेक ध्वनिमुद्रिका या कंपनीनं तयार केल्या.अजूनही त्यातल्या काही ध्वनिमुद्रिका संग्राहकांकडे पहावयास मिळतात.

१९२५ सालापर्यंत ग्रामोफोन कंपनीनं अनेक छोटया लेबल्सना संपवून किंवा आपल्या पंखांखाली घेऊन मक्तेदारी स्थापित केली.उत्तर व दक्षिण भारतात अनेक ठिकाणी ध्वनिमुद्रणांची सोय उपलब्ध करून ठेवली.हजारोंच्या संख्येने एजंट व विक्रेत्यांचं फार मोठं जाळं निर्माण केलं.१९३१ साली रेडियो चांगलाच स्थिरावला व सिनेमा बोलू लागला.परिणामी सिनेमात गाणी आली.ती गाणी सर्वसामान्यांपर्यंत पोहोचावीत हया करिता पुन्हा एकदा ध्वनिमुद्रिकांचा उपयोग होऊ लागला.मुख्य म्हणजे कार्बन कणांचा(ग्रॅन्युल्स)वापर करून बनवलेला सूक्ष्मग्राहक(मायक्रोफोन)विकसित झाला.बॅटरी किंवा वीजेवर चालणारी मोटर वापरून तबकडी ७८ गतीनं फिरवायची सोय झाल्यामुळं चावी भरायचे कष्ट वाचले.हयाला ‘इलेक्ट्रिक’ पद्धतीचं ध्वनिमुद्रण असं म्हणतात.हया पद्धतीमुळं आवाज अधिक स्पष्टपणे मुद्रित होऊ लागला.कर्ण्यात मोठयानं ओरडून गायची गरज उरली नाही.तोवर सुमारे आठशे रेडियो केंद्रे व हजारभर सिनेमागृहे देशभरात विखुरलेली असल्यानं एका रेकॉर्डच्या किमान दोनेक हजार प्रतींच्या विक्रीची हमी मिळू लागली.त्यावरून रेकॉर्डस सतत वाजत असल्यानं आपसूकच जाहिरात पण होत असे.अतिशय लोकप्रिय गाण्यांच्या लाखानी प्रती काढाव्या लागत.

सिनेमाच्या गाण्यांच्या ध्वनिमुद्रिकांनी फार लवकरच जम बसविल्याने इतर संगीताच्या मुद्रण व वितरणाकडं दुर्लक्ष होतंय अशी भावना अनेकांच्या मनात बळावू लागली.त्यामुळे १९३० ते १९५० हया काळात काही छोटया कंपन्या स्थापन झाल्या.त्यात मुंबईत शांतारामबापू(व्ही.शांताराम)हयांच्या पुढाकारानं वडाळा येथे 'दि नॅशनल ग्रामोफोन मॅन्यूफॅक्चरिंग कंपनी' हया स्वदेशी कंपनीची स्थापना झाली.तिथं 'यंग इंडिया' लेबलवरच्या ७८ गतीच्या ध्वनिमुद्रिकांची निर्मिती सुरू झाली.जपानी तंत्रज्ञ व उपकरणं वापरून १९५५ पर्यंत सुमारे पाच हजार गाणी वितरित करण्यात आली.पुण्याच्या 'प्रभात फिल्म कंपनी'नं व मुंबईतल्या 'राजकमल चित्रमंदिर'नं निर्माण केलेल्या बोलपटांतली गाणी हया लेबलवर वितरित केली जात.लेबलच्या एका कोपऱ्यात कलाकाराचा छोटासा फोटो तर तिरंगा हे कंपनीचं बोधचिन्ह छापलेलं असे.बोलपटातली गाणी फारच थोडी निघाली.इतर भारतीय भाषांतली लोकगीतं, संवाद, नाटिका, प्रहसनं व भाषणं खूप मोठया संख्येनं वितरित करण्यात आली.पं.जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस हयांच्या भाषणाच्या ध्वनिमुद्रिका गाजल्या.त्यांच्या लेबलवर हया नेत्यांची सुंदर छायाचित्रं छापलेली आहेत.

हयाच सुमारास ब्रिटिश तंत्रज्ञांच्या मदतीनं 'ब्रॉडकास्ट' लेबलवरच्या ध्वनिमुद्रिका निघू लागल्या.मद्रास व मुंबईतून हिरे माणकांचा व्यापार करणारे दोघे मेहता बंधू हया उद्योगात गुंतलेले होते.इथं ध्वनिमुद्रणं घेऊन लंडन मध्ये छापवून आणीत.साधारणपणे ७८ गतीच्या रेकॉर्ड वरचं एक गाणं तीन ते पाच मिनिटांचं असे.पण हया लेबलवरच्या

रेकॉर्डस तीन, पाच व आठ मिनिटं वाजत. त्यामुळं केसरबाई केरकर, एम. एस. सुब्बलक्ष्मी, मा. क्रिष्णराव, प्यारासाहिब, रसूलनबाई, मजीद खान, बूँदू खान, बेंगलोर नागरत्थनम्मा इ. च्या जास्त वेळाच्या ध्वनिमुद्रिका निघाल्या. ही कंपनी १९४२ च्या सुमारास बंद पडली. पण त्यापूर्वी 'जय भारत' हया नावानं आणखी काही ध्वनिमुद्रिका बाजारात आल्या. त्यात सुशीला टेंबे हया गायिकेच्या आवाजातली पुष्कळ गाणी आहेत.

हयाच दशकात जर्मन बनावटीच्या लाल व निळया रंगाच्या 'ओडियन' लेबलवरच्या ध्वनिमुद्रिका मुंबईच्या बाजारात येऊ लागल्या. १९३0 ते ४0 हया काळात उत्तर व दक्षिण भारतात मिळून तीनेक हजार गाणी वितरित झाली. हयात बोलपट संगीत फार कमी होतं. पण शास्त्रीय व सुगम संगीताच्या रेकॉर्डस खूप निघाल्या. त्यात खानसाहेब अब्दुल करीम खान, त्यांची मुलं हिराबाई व कमलाबाई बडोदेकर तसेच सुरेशबाबू माने व सरस्वती माने (राणे) हयांच्या ध्वनिमुद्रिका खूप खपल्या व लोकप्रिय झाल्या. याशिवाय मास्टर फिरोझ दस्तूर, जी. एम. लोंढे, बाई सुंदराबाई जाधव, बाल गंधर्व, पंडितराव नगरकर, इंदिरा वाडकर अशा अनेकांची गाणी वितरित झाली.

दुसरं महायुद्ध सुरू झाल्यावर ब्रिटिश व जर्मन तंत्रज्ञ तातडीनं मायदेशी निघून गेल्यानं हया कंपन्या बंद पडल्या. 'ओडियन' लेबलवरची काही महत्वाची मुद्रणं व त्यांचे हक्क ग्रामोफोन कंपनीनं विकत घेतले व कोलंबिया लेबलवरती अधिक खपणारी गाणी पुन्हा पुन्हा वितरित केली. दक्षिणेकडे हेच काम सरस्वती स्टोअर्सनं केलं. काळाच्या

ओघात पुष्कळ ध्वनिमुद्रिका नष्ट झाल्या. वाचलेल्या प्रती वैयक्तिक संग्राहकांच्या घरात जाऊन विसावल्या.

तिकडे उत्तरेकडे कलकत्ता शहरात हयाच दशकात 'हिंदुस्थान म्युजिकल प्रॉडक्टस' नावाची कंपनी उभी राहिली. त्यांची मुद्रणं स्वतःच्या स्टुडियोत होत पण रेकॉर्डस मात्र ग्रामोफोन कंपनीच्या डमडम येथील फॅक्टरीत बनत. 'हिंदुस्थान' व 'मेगाफोन' हया लेबलवरती त्यांच्या ध्वनिमुद्रिका निघत. कुंदनलाल सैगल व बेगम अख्तर हे त्यांचे स्टार सिंगर्स. अफाट खपाचे. या शिवाय सचिन देव बर्मन, कमला झरिया. छोटे कुमार गंधर्व व बाल सरोद वादक अमजद अली खान हयांच्या पण ध्वनिमुद्रिका कंपनीनं बनविल्या. पुढं १९७० सालापर्यंत ही कंपनी एल. पी. / ई. पी. च्या जमान्यातही रेकॉर्डस काढीत होती व आज सी. डी. च्या जमान्यातही व्यवसायात टिकून आहे. १९३५ च्या सुमारास 'स्टार हिंदुस्थान रेकॉर्ड कंपनी' नावाची एक छोटी कंपनी निघाली व तिनं तरूण व होतकरू बिसमिल्ला खान हयांच्या शहनाई वादनाच्या रेकॉर्डस बनवल्या. त्यात त्यांनी ठुमरी कजरी सारखे हलके वादन प्रकार मुद्रित केल्याने त्यांचे गुरू व मामा त्यांच्यावर नाराज झाले. पंजाब लाहोर परिसरात 'जिनोफोन', 'सेनोला', 'कलिंग', 'मॅक्सिटोन' सारख्या लहान सहान कंपन्या सुरू होऊन काही मुद्रणांनंतर बंद पडू लागलेल्या होत्या.

१९५० च्या सुमारास एच. एम. व्ही. चं वर्चस्व पूर्णपणे स्थापित झालेलं होतं. सिनेमासंगीताच्या ध्वनिमुद्रिकांमुळं व्यवसाय चांगलाच भरभराटीला आलेला होता. १९०२ पासून ते १९७२ सालापर्यंत ७८

गतीच्या तीन साडेतीन मिनिटंच वाजणा-या लाखेच्या फुटणा-या तबकडयांचंच साम्राज्य होतं.हयांची एकत्र सूची वा माहिती कोष आज तरी उपलब्ध नाही.एका अंदाजानुसार तीनेक लाख ध्वनिमुद्रिका निघाल्या असून त्यात बोलपटसंगीताच्या अडीच लाख आहेत.पैकी हिंदी बोलपट गीतांच्या ध्वनिमुद्रिकांची संख्या एक लाखाच्या आसपास आहे.

१९३१ साली प्लास्टिकच्या रेकॉर्डस बनविण्याच्या प्रयोगाला सुरूवात झाली.रेडियो कार्पोरेशन ऑफ अमेरिका (आर.सी.ए.) हया कंपनीनं ही कल्पना विकसित केली.दुस-या महायुद्धाच्या धुमश्चक्रीत आघाडीवर सैनिकांचं मनोरंजन करण्याकरिता व नेत्यांची भाषणं वगैरे मुद्रित करून ऐकवण्याकरिता काही ध्वनिमुद्रिका प्रायोगिक स्वरूपात बनविण्यात आल्या.१६, ३३, व ४५ गतीनं त्या फिरवाव्या लागत.त्यामुळं तास दीड तासांचं ध्वनिमुद्रण करता येई.पुढं युद्ध आटोपल्यावरती हेच तंत्रज्ञान वापरून जगभरच व्यावसायिक वापराकरिता लाँग प्ले (एल.पी.) व एक्सटेंडेड प्ले (ई.पी.) हया रूपात ध्वनिमुद्रिका बाजारात येऊ लागल्या.एच.एम.व्ही.व संलग्न कंपन्यांच्या बरोबरीनं फिलीप्स, पॉलिडॉर, इनरिको, हिंदुस्थान व कॅसेट किंग गुलशन कुमारांची टी.सीरीज हया कंपन्यापण बाजारात उतरल्या.१९९० सालापर्यंत हया तबकडया बनत होत्या.

दुस-या महायुद्धाच्या परिणामी तंत्रज्ञानानं मोठी झेप घेतली.रेडियो, हवाई वाहतूक, बिनतारी(वायरलेस)संदेशवहन, ग्रामोफोन मशीन्स व रेकॉर्डसच्या तंत्रात भर पडली तर मॅग्नेटिक टेपरेकॉर्डर्स व स्पूल टेप्स

ही नवीन उपकरणं शोधून काढण्यात आली. पहिलं मुद्रण पुसून त्याच टेपवर नवं ध्वनिमुद्रण करायची सोय झाली. त्याचा फायदा रेडियो केंद्रं, सिनेमा स्टुडियो व खाजगी मुद्रणांसाठी मोठया प्रमाणावर होऊ लागला. ही यंत्रं सुरूवातीला तरी श्रीमंतांनाच परवडणारी होती. पण पुढं विकसित झालेला कॅसेट टेप रेकॉर्डर व 'टू इन वन' मात्र (पॉकेट ट्रान्झिस्टर प्रमाणे) अगदी सर्वसामान्यांच्या आवाक्यात आला. १९७० ते ९० पर्यंतचा कालखंड हा रेकॉर्डस व कॅसेटसचाच होता. १९८० च्या आसपास ध्वनि व चित्र दोन्ही साठवून ठेवण्याची सोय असलेल्या लेझर डिस्कस (एल. डी.) व त्या वाजवायचे प्लेयर्स पण काही काळ आपलं अस्तित्व दाखवून गायब झाले. देशोदेशीचे कितीतरी उत्तमोत्तम बोलपट हया माध्यमातून पुन्हा एकदा वितरित झाले. पण डी. व्ही. डी. च्या आगमनानं पाहता पाहता एल. डी. नाहीश्या झाल्या. काही खास संग्राहकांनी मात्र त्या हौसेनं जपून ठेवल्या आहेत.

१९८० च्या सुमारास ग्रामोफोन रेकॉर्डसची अवस्था दयनीय होती. ज्या ग्रामोफोन रेकॉर्डसनी लक्षावधी कानसेनांना भरभरून श्रवणानंद दिला व अवीट गोडीचं संगीत ऐकवलं त्यांना पायदळी तुडवताना पहावयाची वेळ आली. हयाच सुमारास आलेल्या 'कर्ज' बोलपटात ऋषी कपूरनं याची सुरूवात करून दिली. 'ओम शांती ओम' हे गाणं गात असताना ही मंडळी एच. एम. व्ही. लेबल असलेल्या मोठया रेकॉर्डवरती नाचताना दिसतात. 'इत्तेफाक' नावाच्या बोलपटातला व्हील चेअरवरचा अपंग डॅनी आपल्या बायकोला (नंदा) रेकॉर्ड फेकून मारताना दिसतो. मोठाल्या शो रूम मध्ये, बूट चपला व

कपडयांच्या दुकानांतून सजावटीसाठी रेकॉर्डस छतापासून टांगलेल्या दिसू लागल्या. पूर्वीच्या लाखेच्या ध्वनिमुद्रिकेचा एखादा फुटका तुकडा विंचू दंशावरचा उतारा म्हणून घरोघरी बाळगत असत. मुंबईत एल. पी. रेकॉर्डसवर देवादिकांची, नट नटयांची, नेत्यांची वा निसर्ग चित्रं रंगवलेली/डकवलेली कॅलेंडर्स फूटपाथवर विकायला मांडलेली दिसतात. गरीबांच्या घरात ती सजावटीकरता भिंतीवरती लटकावलेली असतात. दूरदर्शनवरच्या 'मेरी आवाज सुनो' 'टीवीएस सा रे गा मा' 'अंताक्षरी' सारख्या जुन्या कार्यक्रमांत रेकॉर्डसचा वापर मंचावरच्या सजावटीत होत असे. 'सारे सारे गाऊ या' हया मराठी गाण्यांच्या स्पर्धांच्या कार्यक्रमात स्पर्धक, परीक्षक व संचालक प्रशांत दामले हे सगळेच रेकॉर्डच्या प्रतिकृतीनं सजलेल्या मंचावर ध्वनिमुद्रिका पायाखाली घेऊनच उभे असत.

१९८५ मध्ये सोनी कंपनीनं प्रथम प्रायोगिक स्वरूपातली कॉम्पॅक्ट डिस्क बाजारात आणली. पाहता पाहता तिनं मनोरंजनाबरोबरच संगणकविश्व व त्यात साठवलेल्या विविध प्रकारच्या माहितीच्या साठवणीच्या कामात एक नवं जगच खुलं केलं. पाहता पाहता तिचा आकार लहान होत गेला तर साठवणीची क्षमता वाढत गेली.

शतक समाप्तीच्या वेळी डेस्कटॉपची जागा लॅपटॉप घेणार हयाची चिन्हं स्पष्टपणानं दिसायला लागलेली होती. आज पामटॉपला बाजूला सारून सगळं काही मोबाईल फोन व आयपॉडच्या चिमुकल्या डब्यांत जाऊन बसणार हयाची चाहूल लागलेली आहे. पण त्याच वेळी पुन्हा एकदा जुन्या प्लास्टिकच्या न फुटणाऱ्या ध्वनिमुद्रिकांच्या उत्पादनाला

सुरूवात झालेली असून युरोप अमेरिका व चायना मध्ये रेकॉर्ड प्लेयर्स च्या निर्मितीला सुरूवात पण झालेली आहे.रेडियो जॉकी व डिस्कोथेक मधल्या डिस्क जॉकी मंडळींना घासण्याकरिता हया रेकॉर्डस बनविल्या जात आहेत, डान्स फ्लोअरवाल्यांची ही थेरं लवकरच ओसरतील अशी टीका सुरूवातीला झाली होती.तिच्यात काही तथ्यपण होतं.पण अगदी अलिकडं आपल्याकडं पण मुंबई दिल्ली इथं पुन्हा एकदा रेकॉर्डस बाजारात दिसायला लागल्या असून ग्राहक वाढत आहेत.हे कितपत टिकून राहील ते काळच ठरवणार आहे.

ध्वनिमुद्रिकांना भविष्यात पुन्हा एकवार उर्जितावस्था येईलही कदाचित.पण काळाच्या ओघात गडप होऊ पाहणा-या ७८ गतीच्या हजारो रेकॉर्डस, एल.पी.आणि ई.पी.व त्यांच्यावरचं संगीत जपून ठेवणं हे अतिशयच महत्वाचं काम आहे.त्यासाठी अशा संग्राहकांना व रसिकांना एकत्र आणणं जरूरीचं होतं.त्याकरिताच १९९० साली मुंबईत 'सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स' हया संस्थेची स्थापना करण्यात आली.याकामी ऑस्ट्रेलियातले डिस्कोग्राफर श्री.मायकेल किन्नर यांची प्रेरणा व मोलाचं मार्गदर्शन लाभलं.जुन्या ध्वनिमुद्रित संगीताची साठवण करून व काळजीपूर्वक निगा राखून पुढच्या पिढयांपर्यंत पोहोचविण्याच्या कामी ही संस्था काम करते आहे.मुंबई शिवाय पुणे, सोलापूर, नांदेड, अमरावती, तुळजापूर, गोवा, बडोदा व कलकत्ता येथली संग्राहक मंडळी हया कामात गुंतली आहेत.महिन्यातून एकदा सार्वजनिक ठिकाणी जमून जुनी गाणी ऐकण्याचे व ऐकवण्याचे कार्यक्रम मोफत केले जातात.'दि रेकॉर्ड न्यूज' नावाचं वार्षिक प्रकाशित होतं.त्याचे देशात १५० तर परदेशात

१00 वर्गणीदार आहेत. त्यात अनेक मान्यवर व्यक्ती व संस्था आहेत. अभ्यासक, रसिक व संशोधक हया सर्वांना याचा मोठाच उपयोग होतो. सोलापूर शहरातल्या सार्वजनिक वाचनालयात पुस्तकांच्या बरोबरीनंच ध्वनिमुद्रिकांनाही स्वतंत्र दालन मिळालं असून हा प्रयोग देशभर राबवता येण्यासारखा आहे. त्यातूनच राष्ट्रीय ध्वनिमुद्रण संग्रहालय (दि नॅशनल साऊंड अर्काइव्ह) उभारण्याच्या कल्पनेला चालना मिळू शकेल. त्यात ध्वनिमुद्रिका, ऑडियो कॅसेटस, सी. डी. तसेच डी. व्ही. डी. हयांची पण साठवण व जतन होईल.

---

## चौकटींत देण्यासारखी विशेष माहिती

**विविध आकार -** अगदी सुरूवातीच्या ७८ गतीच्या ध्वनिमुद्रिका स्लेट डस्ट व लाखेच्या मिश्रणाच्या बनवत. सहा, सात, आठ, नऊ, दहा, पावणे अकरा व बारा इंच व्यासाच्या व भाकरीएवढया जाडीच्या रेकॉर्डस फार काळजीपूर्वक हाताळाव्या लागत. हातातून पडल्यास तुकडे होऊन ते फेकूनच द्यावे लागत. काही ध्वनिमुद्रिका ८0/८२ पासून शंभर गतीनं फिरवाव्या लागत. सर्वसाधारणपणे परिघापासच्या खाचेतून सुई फिरू लागे व गाणं संपताना ती आत पोहोचे. पॅथे कंपनीच्या १00 गतीच्या ध्वनिमुद्रिका मात्र हया उलट वाजत. सुई आतल्या बाजूनं फिरत फिरत रेकॉर्डच्या कडेला येऊन थांबे. हया ध्वनिमुद्रिका आता फार दुर्मिळ झालेल्या आहेत.

**विविध मुद्रण प्रकार -** शास्त्रीय व सुगम संगीत, नाटयसंगीत, बोलपटांतली गाणी, वाद्यसंगीत, नाटिका, संवाद, भाषणे, प्रहसनं,

पशुपक्ष्यांचे आवाज, नकला, लोकसंगीत, भावगीते, भक्तीगीते, लावण्या, पोवाडे, ऑर्केस्ट्रा (वाद्यमेळ), प्रचारगीते, जाहिराती, लेसन पाठ इ.

**वैशिष्टयपूर्ण ध्वनिमुद्रिका -** ग्रामोफोनच्या कर्ण्यासमोर बसून डोळे मिटून धन्याचा आवाज ऐकणारा निप्पर कुत्रा हे हिज मास्टर व्हॉईस (एच.एम.व्ही.) कंपनीचं बोधचिन्ह जगातल्या पहिल्या दहा लोकप्रिय ब्रँडसपैकी एक.ते १९१५ नंतर वापरात येऊ लागलं.त्या अगोदर तबकडीवर बसून पिसानं खाचा पाडणारा दोन पंखवाला छोटा देवदूत(रेकॉर्डिंग एंजल)हे चिन्ह लेबलवरती आढळतं.लाखेबरोबरच काही प्रयोग न फुटणारं साहित्य वापरूनही झाले.अगदी सुरूवातीला १९0५ साली निकोल कंपनीनं कार्डबोर्ड (पुठ्ठा) चा तर १९४0 च्या आसपास बुलबुल कंपनीनं प्लाटिकचा वापर करून बघितला.तांबे, पितळ व ॲल्युमिनियमही वापरून पाहिलं.पण टिकावूपणाच्या कसोटीवर हे प्रयोग बाद झाले.पुढे कॉम्पॅक्ट डिस्कच्या जमान्यात अतिशय पातळ अशा धातूच्या थरांमध्ये लेझर किरणांची शलाका वापरून माहितीचं लेखन व वाचन होऊ लागलं.

**पझल रेकॉर्ड -** हयात एकात एक गुंतलेल्या कडयांप्रमाणे खाचांची रचना केलेली असते.एकेक मिनिट वाजणारी तीन गाणी मुद्रित केलेली असतात.सुई ज्या खाचेत शिरेल ते गाणे वाजू लागतं.१९२0 साली काही ध्वनिमुद्रिका बनवलेल्या होत्या.पुढे ‘अमर भूपाळी’ बोलपटाच्या यशानंतर त्यातल्या गाण्यांची अशी एक पझल प्लेट शांतारामबापूंनी मुद्दाम बनवून घेतली होती.

**खाचांची लांबी -** ७८ गतीच्या तीन साडे तीन मिनिटं वाजणा-या दहा इंच व्यासाच्या ध्वनिमुद्रिकेचा फिरण्याचा वेग ताशी सव्वीस किलोमीटर इतका भरतो तर हया कालावधीत ती सुमारे २७५ वेळा आसाभोवती फिरते.सुईने खाचांमधून केलेला प्रवास म्हणजेच खाचांची एकत्रित लांबी सुमारे दीड किलोमीटर इतकी होते.

**काही रेकॉर्ड लेबल्स -** बेका, बेका ग्रँड, ग्रामोफोन कन्सर्ट, निकोल, पॅथे, ओडियन, रामाग्राफ, जेम्स ऑपेरा, सिंगर, सन डिस्क, रॉयल, बिनापानी, कमला, एच.बोस, सिंच, ऐंजल, ब्रॉडकास्ट, सिरको, जय भारत, कोलंबिया, कलिंग, यंग इंडिया, एअरोफोन, वंदे मातरम, भारत, डायमंड, मारवारी, दिलरूबा, एक्सलसिअर, हिंदुस्थान, जिन-ओ-फोन, मेगाफोन, मॅक्सिटोन, किंग, लिमाफोन, लोटस, कोहिनूर, हचिन्स, मूवीटोन, निशात, न्यू थिएटर्स, निझाम, नूर-ए-इस्लाम, पारलोफोन, पायोनियर, फिलिप्स, फिनिक्स, रीगल, रामेश्वर, सेनोला, संगीत, सरस्वती सिनेटोन, प्रभात, शहेनशाही, सूर भारती, स्वरगंगा, ताज व तानसेन.

---

**काही ग्रामोफोन सेलिब्रिटीज (१९०२-१९५०)**

**गायक** ः रहिमत खान हद्दू खान, अब्दुल करीम खान, प्यारा साहिब, मुहम्मद हुसैन, मौजुद्दिन खान, मल्लिकार्जुन मन्सूर, बाल गंधर्व, माष्टर कृष्णराव फुलंब्रीकर, केशवराव भोसले, बापूराव पेंढारकर, माष्टर दिनानाथ मंगेशकर, गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे, प्रो.विनायकबुवा

पटवर्धन, प्रो.बी.आर.देवधर, प्रो.नारायणराव व्यास, नथुबुवा, पं.ओंकारनाथ ठाकूर, सवाई गंधर्व, निस्सार हुसेन खान ऑफ बडोदा, फैय्याज खान, विलायत हुसेन खान, गंगाधरपंत लोंढे, माधवराव वालावलकर, शंकरराव सरनाईक, सुरेशबाबू माने, फिरोज दस्तूर, बडे गुलाम अली खान, जी.एन.जोशी, भीमसेन जोशी, जे.एल.रानडे, मनहर बर्वे, अब्दुल वहिद खान, अमीर खान, कुमार गंधर्व, वसंतराव देशपांडे, पंडितराव नगरकर, सुधीर फडके, गजाननराव वाटवे, गोविंद कुरवाळीकर, बबनराव नावडीकर, सुरेश हळदणकर, प्रल्हाद, विठ्ठल व कृष्णा शिंदे, मा.पर्शराम, व्ही.जी.भाटकर, रामदास कामत, राम मराठे, बसवराज राजगुरू, छोटा गंधर्व, भालचंद्र पेंढारकर, मा.हिम्मत, मा.वसंत अमृत ऑफ सूरत, मा.अश्रफखान, प्रो.एस.एस.मनोहर, कृष्णराव शेंडे, मा.शांताराम कामत, शेरीफखान ऑफ ग्वालियर, मारूतीराव पहिलवान, रामभाऊ अष्टेकर, विष्णुपंत पागनीस, कृष्णराव तेंडुलकर, वेंकटराव रामदुर्गकर, ए.एन.बडोदेकर, भगवानदास, के.सी.डे, कुंदनलाल सैगल, पंकज मलिक, मणिलाल, भगत कंवरराम, शाहीर नानिवडेकर, ग.द.दीक्षित, श्रीपतराव लोखंडे, पिराजीराव सरनाईक, मुचाटे, शरद मुठे इ.

**वादक** ः बरकतुल्ला खान, रवी शंकर, रईस खान, इनायत खान, विलायत खान, अब्दुल हलीम जाफर खान, निखिल बॅनर्जी, जया बोस, अन्नपूर्णा देवी, अरविंद पारिख (सितार),अली अकबर खान, अमजद अली खान, बहादूर खान, झरीन दारूवाला, शरण राणी (सरोद), बूँदू खान, राम नारायण, रघुनाथ प्रसाद, सुलतान खान,

मजीद खान (सारंगी), पं.शिवकुमार शर्मा, सतीश व्यास, उल्हास बापट (संतूर), बिस्मिल्ला खान, तालीम हुसैन, शंकरराव गायकवाड (शहनाई),अप्पा दुराई व हिमांशु बिस्वास (जलतरंग), पं.पन्नालाल घोष, हरीप्रसाद चौरासिया, (बासरी),व्हॅन शिप्ले, ब्रिज भूषण काब्रा (गिटार), गोविंदराव टेंबे, विठ्ठलराव कोरगांवकर, ज्ञानप्रकाश घोष, गोविंदराव पटवर्धन, बलराम सिंग (हार्मोनियम), अहमदजान तिरखवाँ, खाप्रूमामा पर्वतकर, अल्लारखाँ, झाकीर हुसैन (तबला),गजानन कर्नाड, श्रीधर पार्सेकर, व्ही.जी.जोग, अकिंचन दत्त, परितोष सैल, गजाननबुवा जोशी (व्हायलिन), मा.इब्राहिम (क्लॅरिओनेट)

**गायिका** ः गौहरजान ऑफ कलकत्ता, जानकीबाई ऑफ अलाहाबाद, मलकाजान ऑफ आग्रा, जोहराबाई आग्रेवाली, दोअन्नी जान, जराव जान, रतनबाई, धोंडूताई व बाळाबाई संकेश्वरकर, बाई सुंदराबाई जाधव पुणेकरीण, बाई लक्ष्मीबाई ऑफ बरोडा, मेहबूबजान ऑफ सोलापूर, मिस आझमबाई पिसाळ, अश्गरी जान, किटी जान, मिस गोहर (विजापूर), अमीरजान कर्नाटकी, मिस इंदुबाला, कानन बाला, कमला झरिया, कानन देवी, बाई ताराबाई ऑफ सोलापूर, शफीकुनबाई, निलमबाई, बेनजीर बाई, वहिदन बाई, जद्दनबाई, मिस अच्छन, विठाबाई आमोणकर, चंदा कारवारकरीण, मिस दुर्गाबाई ऑफ बनारस, बाळाबाई काळे, मिस काशीबाई, पियरीजान, आनंदीबाई ऑफ राजगढ, कालीजान ऑफ दिल्ली, शमशाद बाई, सरास्वती बाई फातरफेकर, हिराबाई बडोदेकर, कमलाबाई बडोदेकर, सरस्वती माने (राणे), केसरबाई बांदोडकर, केसरबाई केरकर,

मोगुबाई कुर्डीकर, गंगूबाई हनगल, रोशन आरा बेगम, सुरैय्या, नूरजहाँ, मिस दुलारी, नीलम बाई, माणिक वर्मा, जयमाला शिलेदार, इंदिरा वाडकर, केसर व बाळाबाई वाडकर, गिरीजाबाई केळेकर, परवीन सुलताना, शांता हुबळीकर, शांता आपटे, वासंती (घोरपडे), पदमावती शाळिग्राम, सुशीलराणी पटेल, सुशीला टेंबे, शांता मणेरीकर, ललिता देऊळकर, प्रमोदिनी देसाई, प्रमिला जाधव, इंदिराबाई खाडिलकर, लीला लिमये, सुमन माटे, उषा अत्रे, सुमन बाणावलीकर, आशालता वाबगावकर, कान्होपात्रा, ज्योत्स्ना भोळे, मालती पांडे, कु.शामला माजगावकर, कु.इंदुमती चौबळ, कृष्णा उद्यावर

## संग्राहकांचे काही मनोरंजक किस्से व आठवणी

---

## सुरेश चांदवणकर

अगदी लहानपणी आजोळी पेटीचा ग्रामोफोन होता.तेव्हा मी जेमतेम पाच सहा वर्षांचाच असेन.पण त्यावेळच्या माझ्या आठवणी अगदी लख्ख आहेत.ध्वनिमुद्रिकेच्या लेबलवरचं ७८ गतीनं फिरत असलेलं ते कुत्रयाचं चित्र, डाव्या हातानं पेटीच्या कोपरावर दाब देऊन उजव्या हातानं भराभरा चावी देऊन मोटारीची स्प्रिंग गुंडाळावी लागे.फिरत्या तबकडीवरच्या खाचेवरती साऊंड बॉक्समधली सुई अलगद पण सफाईदारपणे टेकवणारा सर्वात धाकटा मामा मला अगदी स्पष्टपणे आठवतो.माझ्यासारख्या छोटया मुलांनी हात लावून बिघडवू नये म्हणून फोनो उंच स्टुलावरती ठेवीत.जमिनीवर असेल तर आम्हा मुलांना चार हात दूरच बसवून जवळ येऊ देत नसत.त्यातून

निघणा-या आवाजावर काहीच नियंत्रण नसल्यानं घर भरून जात असे व फार दूरवर गाणं ऐकू येत असे.तेव्हापासूनच बहुधा हया यंत्रानं माझ्यावर नकळत गारूड केलं असावं.

जरा मोठा झाल्यावरही हया विषयातली माझी आवड लक्षात घेऊन वडिलांनी १९६0 च्या आसपास एक फोनो विकत घेतला.तो काळ ७८ गतीच्या बहराचा व एल.पी./ई.पी.च्या आगमनाचा होता.पुण्यात आमचं रद्दी कागदाचं दुकान होतं.फेरीवाले दारोदार फिरून भंगार गोळा करीत व ते आमच्या दुकानात आणून विकत.त्यात रद्दी, वर्तमानपत्रांबरोबर डबे बाटल्या व ध्वनिमुद्रिकाही असत.रेकॉर्डच्या मध्यावर असलेल्या भोकातून दोरी ओवून असे गठ्ठे घेऊन येत असत.मग भिंतीवर ठोकलेल्या खिळयावर रेकॉर्ड अडकवून, हातानं फिरवून चित्र फिरताना मी पहात बसे.फिरणा-या खाचेवर पिन किंवा टाचणी टेकवून येणारा बारीक आवाज ऐकायला मजा येई.जाड काळया लेबलवरच्या ध्वनिमुद्रिका मुळीच आवडत नसत.मग पुढं पेटीचा ग्रामोफोन आल्यावर त्यावरच्या जड साऊंड बॉक्समधील धारदार सुईने चरे पाडणे व कोरलेल्या आवाजाबरोबरच हा आवाज पण ऐकण्याचा चाळाच लागला.हीच पद्धत पुढे डिस्कोथेक मधली डिस्क जॉकी (डी.जे.)मंडळी वापरतील अशी त्याकाळात कल्पना पण नव्हती.कितीतरी मौल्यवान रेकॉर्डसची नासाडी केल्याबद्दल आता वाईट वाटतंय.

१९७0/७५ मध्ये ऑडियो टेपस व लाँग प्लेईंग रेकॉर्डसनी ७८ गतीच्या ध्वनिमुद्रिकांना मागं टाकायला सुरूवात केलेली

होती.त्यावेळी मी महाविद्यालयात शिकत होतो.मे व दिवाळीच्या सुटीत मामाकडे येत असे.तेव्हा मुंबईतल्या 'चोरबाजारा'चा शोध लागला.अगदी अलिबाबाची गुहा सापडल्याचा आनंद झाला.खाऊचे व बक्षिसा दाखल मिळालेले पैसे जुन्या दुर्मिळ ध्वनिमुद्रिका खरेदी करण्यात खर्च होऊ लागले.पुढं नोकरीच्या निमित्तानं मुंबईत आलो व तेव्हा बरोबर रेकॉर्डसपण घेऊन आलो.१९९० च्या आसपास इतर संग्राहकांना घेऊन 'सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स' ची स्थापना झाली व व्यक्तिगत संग्रहाला एक संस्थात्मक आकार आला.

---

प्रभाकर दातार

माझ्या लहानपणी कुर्ल्याला आमच्या घरी मराठी रंगभूमीवरचे अनेक प्रख्यात नटमंडळी येत असत.बालगंधर्व, लोंढे, छोटा गंधर्व यांना मी जवळून बघितलेलं आहे.त्यांची पुष्कळ कामं बघितली व गाणी पण ऐकली.त्यातूनच मग जुन्या नाटयसंगीताच्या व त्याचं मूळ असलेल्या चीजांच्या दुर्मिळ ध्वनिमुद्रिका गोळा करायला सुरूवात केली.पुढं पु.ल.देशपांडे हयांनी सुचविल्यावरून जुन्या मराठी बोलपटातल्या गाण्यांच्या ध्वनिमुद्रिका गोळा करायला सुरूवात केली.

एकदा दादरला प्लाझा सिनेमाकडून शिवाजी मंदिरच्या फूटपाथवरून चाललो होतो.एका स्टोव्ह दुरूस्त करणा-याच्या दुकानात सहज नजर गेली.एका जीर्ण व जुन्या पुराण्या लाकडी कपाटात काचेच्या तावदानामागे काही रेकॉर्डस दिसल्या.चवकशी करता त्या दुकानदाराने अट घातली की सगळया घ्याव्या लागतील व दहा रूपये पडतील.न

पाहताच.पैसे चुकते केले व त्या पाच सहा रेकॉर्डस हातात घेऊन बघितल्या.संगीतसूर्य केशवराव भोसले हयांच्या आवाजातल्या होत्या.अत्यंत दुर्मिळ.चेहे-यावरचा आनंद दुकानदारापासून लपवणं फार अवघड गेलं.

मुंबईतला चोर बाजार हा जुन्या रेकॉर्डस हमखास मिळण्याचं ठिकाण.तो दर शुक्रवारी भरतो.तिथून जमविलेल्या प्रत्येक ध्वनिमुद्रिकेमागे एकेक कहाणी आहे.आठवण आहे.त्यावरूनच रिझर्व बँकेतल्या मित्रांच्या आग्रहाने एक दिवस 'शुक्रवारची कहाणी' हया शीर्षकाचा कार्यक्रम सादर करून त्यात जुनी गाणी ऐकवली.

एकदा चोरबाजारातले रेकॉर्डसचे ढीग उपसत होतो.एका रेकॉर्डवर मराठी भावगीत होतं व गायकाचं नाव लिहिलेलं होतं - 'मास्टर राम्र चितळकर'.विक्रेत्याला हेच ते प्रसिद्ध सी.रामचंद्र हे ठाऊक नसल्यानं ती ध्वनिमुद्रिका अवघ्या आठ आण्याला मिळाली.मात्र संगीतकार सी.रामचंद्र हे नाव असलेल्या एका फार दुर्मिळ चित्रपटगीताची ध्वनिमुद्रिका मात्र पाच रूपयांना घ्यावी लागली.

असंच एकदा रस्त्यावर एका विक्रेत्याकडे भूगंधर्व रहिमत खान हद्दू खान हयांच्या आवाजातल्या काही रेकॉर्डस दिसल्या.चेहे-यावरचा आनंद मोठया कष्टानं लपवून रेकॉर्डस हातात घेतल्या व 'कौन है ये रहमतखान.नाम भी कभी सुना नही' अशी बतावणी सुरू केली.विक्रेता माहीतगार व मोठा बेरकी होता.म्हणाला, 'रहिमतखान कोण हे तुम्हाला चांगलंच माहीत आहे.नाटकबाजी करू नका.हया

रेकॉर्डस तुम्ही घेणार आहात. दहा दहा रूपये पडतील प्रत्येकी'. मुकाटयानं खिशातून पैसे काढून त्याच्या हातावर ठेवले व रेकॉर्डस पिशवीत टाकून पैसे संपले असल्यानं घरची वाट धरली.

हया रेकॉर्डसच्या छंदापायी अनेक मित्र लाभले. त्यांच्याशी अगदी छान मैत्री जमली. अधून मधून रेकॉर्डस ऐकण्यासाठी व त्यावर गप्पा मारण्यासाठी एकत्र जमतो व तासचे तास रमून जातो. एकमेकांच्या वाढदिवशी रेकॉर्डसच्याच भेटी देतो. जुनी गाणी ऐकताना व ऐकवताना होणारा आनंद हा वर्णनापलिकडचा आहे.

---------------------------------------------------

**नारायण मुलाणी**

ग्रामोफोन रेकॉर्डसचा व माझा फार लहानपणापासूनचा संबंध. कारण माझ्या काकांची एजन्सी होती व गिरगावात रेकॉर्डस विक्रीचं दुकान होतं. त्यामुळं घरात पुष्कळ मॉडेलचे फोनो व ध्वनिमुद्रिकांचे ढीग असत. ते पहातच मी मोठा होत होतो. रेकॉर्डस व त्यावरच्या रंगीबेरंगी लेबलचं मला मोठं आकर्षण वाटे. अगदी लहान वयात लिहिता वाचता येत नसे. पण नुसतं लेबल पाहून मी गाणं सांगे. माझी आई गाणं सांगे व त्याची रेकॉर्ड मी अचूकपणे काढून आणत असे. तेव्हापासूनच मी हया छंदात अडकलो. पाहता पाहता हजारो रेकॉर्डसचा संग्रह झाला व माझ्यासारखे अनेक वेडे भेटले.

या वेडया नादातूनच अनेक थोर गायक/गायिका व संगीतकारांशी परिचय होण्याचा योग आला. सुधीर फडके, स्नेहल भाटकर व दत्ता

डावजेकरांसारख्या बजुर्ग संगीतकारांपासून ते तुषार भाटियासारख्या अगदी तरूण संगीतकारांपर्यंत अनेकजण माझ्याकडे गाणी ऐकायला येऊन गेलेले आहेत. आजही जुन्या गाण्यांचा संदर्भ हवा असल्यास अनेकजण हक्कानं माझ्याकडे येतात व त्यांना मदत करायला मलाही मनापासून आवडतं. डॉ. अशोक रानडे हयांच्यासारखे विद्वान व व्यासंगी अभ्यासक जेव्हां येतात तेव्हां संग्रहाचे चीज झाल्यासारखे वाटते. प्रसिद्ध गायिका राजकुमारी व प्रभात काळातली बालनटी वासंती अलिकडेच माझ्या घरी येऊन त्यांच्या रेकॉर्डस ऐकून गेल्या. काही वर्षांपूर्वी श्रीमती लता मंगेशकरांनी काही हिंदी गाणी माझेकडून मागवून घेतली होती व त्याबद्दल समाधान व्यक्त केले होते. ती गोष्ट मला खूपच आनंद देऊन गेली.

---

---

१0 ऑगस्ट २0११.

---

डॉ. सुरेश चांदवणकर,
८0१ भास्करा, टी. आय. एफ. आर. हौ. कॉम्प्लेक्स
नेव्हीनगर, कुलाबा मुंबई - ४0000५.

